**कल्याण आयुक्य, महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करणेबाबत.**
**-श्री. रविराज इळवे, कामगार उप आयुक्त,**

# महाराष्ट्र शासन
## उद्योग, उर्जा व कामगार विभाग
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि-२०२०/प्र.क्र.८५/कामगार-८**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २२ ऑक्टोबर,२०२०.

**प्रस्तावना :-**

कामगार विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ हे स्वायत्त मंडळ कार्यरत आहे. सन २०१२ पासून सदर मंडळातील कल्याण आयुक्त या पदावर पुर्णवेळ अधिकारी नियुक्त करण्यात आलेला नाही. महाराष्ट्र कामगार कल्याण निधी नियम, १९५३ च्या नियम १८-अ नुसार कल्याण आयुक्त पदावर नामांकनाद्वारे, वरिष्ठ उप कल्याण आयुक्त पदावरील ०३ वर्षांची सेवा झालेल्या अधिका-याची कल्याण आयुक्त पदावर पदोन्नतीने आणि कामगार उप आयुक्त अथवा सहायक कामगार आयुक्त या संवर्गातील अधिका-यांमधून प्रतिनियुक्तीने नेमणुक करण्याची तरतुद आहे. महाराष्ट्र कामगार कल्याण निधी नियम,१९५३ च्या नियम १८-अ (अ) (दोन) नुसार अर्थशास्त्र व समाजशास्त्र या विषयातील राज्य शासन मान्यताप्राप्त कोणत्याही विद्यापीठाची पदवी आणि सहायक कामगार आयुक्त पदापेक्षा कमी नसेल अशा पदावर सलग ०५ वर्षे सेवा पुर्ण झाली असेल, तसेच हिंदी भाषा परिक्षा उत्तीर्ण झाले असतील, असे अधिकारी कल्याण आयुक्त या पदावर दोन वर्षाकरिता प्रतिनियुक्तीने जाण्यास पात्र असतील. त्यास अनुसरुन उक्त सर्व तरतुदीनुसार श्री. रविराज इळवे, कामगार उप आयुक्त, मुंबई हे कल्याण आयुक्त या पदावर प्रतिनियुक्तीने जाण्यास पात्र ठरत असल्याने त्यांना कल्याण आयुक्त, महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ, मुंबई या रिक्त पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेशः-**

श्री. रविराज इळवे, कामगार उप आयुक्त, मुंबई यांची कल्याण आयुक्त, महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ, मुंबई या पदावर पुढील दोन वर्षाच्या कालावधीकरिता प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

२. श्री. रविराज इळवे, कामगार उप आयुक्त यांच्या प्रतिनियुक्तीच्या अनुषंगाने विहित करण्यात आलेल्या अटी व शर्तीबाबत स्वतंत्ररित्या शासन आदेश निर्गमित करण्यात येईल.

३. श्री. रविराज इळवे, कामगार उप आयुक्त यांच्याकडे कामगार आयुक्त कार्यालयातील कामगार उप आयुक्त (औद्योगिक संबंध) आणि सह आयुक्त (माथाडी) या पदाचा कार्यभार पुढील आदेश होईपर्यंत

अतिरिक्त स्वरुपात सोपविण्यात येत आहे. सदर शासन आदेशानुसार श्री.इळवे यांनी कामगार आयुक्त कार्यालय, मुंबई येथून कार्यमुक्त व्हावे आणि कल्याण आयुक्त, महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ, मुंबई या पदावर तात्काळ रुजु व्हावे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२२१५३८०७६०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DR. SHRIKANT LAXAMANRAO PULKUNDWAR

Digitally signed by DR. SHRIKANT LAXAMANRAO PULKUNDWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=INDUSTRIES, ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=feb24b5f5d1512bb47f7bae5ad1db4953358cd43c999bdf0814c6bb78364d50a, cn=DR. SHRIKANT LAXAMANRAO PULKUNDWAR
Date: 2020.10.22 17:01:12 +05'30'

**(डॉ. श्री.ल.पुलकुंडवार)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. कामगार आयुक्त, कामगार भवन, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०००५१
५. कामगार उप आयुक्त (प्रशासन),कामगार भवन, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०००५१
६. कल्याण आयुक्त(प्र.), महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ, मुंबई.
७. महालेखापाल (ले.व ह.व ले.व प.)-१, प्रतिष्ठा भवन, महर्षी कर्वे मार्ग,मुंबई- ४०००२१.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. स्थानिक लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०.श्री. रविराज इळवे, कामगार उप आयुक्त, मुंबई (कामगार आयुक्त यांच्या मार्फत)
११.कक्ष अधिकारी/कामगार-१०, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.निवडनस्ती (कामगार-८).